**राज्य योजना सन २०१८-१९ अंतर्गत निधी वितरण - महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना (२४०६-A०८७)**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५१८ /प्र.क्र.२०६/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०१.०२.२०१९

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.६३/(प्राणी प्राधिकरण )/१२८/१८-१९ दिनांक :-२३.०४.२०१८.
३. शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५१८/प्र.क्र.२०१६/फ-१ दिनांक १५.०५.२०१८.
४. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ राज्यस्तरीय योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना (२४०६-A०८७) या लेखाशिर्षांतर्गत रु. २००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना (२४०६-A०८७) या योजनेतर्गत रु. २००.०० लक्षचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला असून संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये रु. १४०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना (२४०६-A०८७) या योजनांतर्गत शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावास अनसरुन खालील अटींच्या अधीन राहून **रुपये २०.०० लक्ष निधी** खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. प्रस्तावीत खर्च:- लेखाशिर्ष २४०६, वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण, (००) (१९) महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरणाची स्थापना (२४०६ A०८७ ) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.
२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. बांधकामे प्रस्तावित असल्यास शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधित जबाबदारी नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

५. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

६. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

७. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५.०१.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२१५१०३६५०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2019.02.02 15:11:31 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति :**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरण, नागपूर
५) महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.